मौजे खेडी व मौजे सोनेगाव राजा, ता. कामठी जि. नागपूर या पूरग्रस्त गावातील नागरी सुविधांच्या कामांना निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग (आपत्ती व्यवस्थापन प्रभाग)**

शासन निर्णय क्रमांक-एससीवाय-०६/२०१८/प्र.क्र.२७/म-११,

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२

दिनांक:- १२ फेब्रुवारी, २०१९.

वाचा:- १) शासन निर्णय,महसूल व वन विभाग, क्रमांक:जीटीएन १०८३/२०१७/र-१२ दिनांक १०/०२/१९८३.

२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक: एफएलडी-२०१६/प्र.क्र.३५/र-१२ दिनांक ११/०९/२०१७ व शुध्दीपत्रक दिनांक ०२/०६/२०१८.

३) शासन निर्णय क्र. महसूल व वन विभाग, क्रमांक: एफएलडी-२०१६/ प्र.क्र.३५/ र- १२ दिनांक ०२/०६/२०१८ .

४) शासन निर्णय क्रमांक-एससीवाय-०६/२०१८/प्र.क्र.२७/म-११,दि.०२/०७/२०१८.

५) शासन निर्णय क्र. महसूल व वन विभाग, क्रमांक: एफएलडी-२०१६/ प्र.क्र.३५/ र-१२ , दिनांक १९/०१/२०१९.

**प्रस्तावना :-**

मौजे खेडी व मौजे सोनेगाव राजा, ता. कामठी जि. नागपूर या पूरग्रस्त गावातील नागरी सुविधांच्या कामांना संदर्भ क्रमांक ०२ येथील शासननिर्णय दिनांक ११/०९/२०१७ अन्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. त्यास अनुसरुन मौजे खेडी व मौजे सोनेगाव राजा, ता. कामठी जि. नागपूर या पूरग्रस्त पुनर्वसित गावांना नागरी सुविधा कामांना प्रशासकीय मान्यतेच्या २०% निधी उपलब्ध करुन देण्याबाबत संदर्भ क्रमांक ०३ येथील शासनिर्णय दिनांक ०२/०६/२०१८ अन्वये रुपये ७८,०३,५४३/- इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात आली. यानुषंगाने उपरोक्त संदर्भ क्रमांक ०४ येथील शासन निर्णयान्वये निधी वितरीत करण्यात आला आहे.

आता, उपरोक्त संदर्भ क्रमांक ५ येथे नमूद शासन निर्णय दिनांक १९/०१/२०१९ अन्वये रुपये १,९३,४१,९४२/- इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मौजे खेडी व मौजे सोनेगाव राजा, ता. कामठी जि. नागपूर या पूरग्रस्त गावातील नागरी सुविधांच्या कामांना उपरोक्त संदर्भ क्रमांक ०४ अन्वये प्रशासकीय मान्यतेच्या २०% निधी रुपये ७८,०३,५४३/- वितरीत करण्यात आला होता. आता, उपरोक्त शासननिर्णय संदर्भ क्रमांक ०५ दिनांक १९/०१/२०१९ अन्वये मंजूरी दिल्यानुसार रुपये १,९३,४१,९४२ (अक्षरी रुपये एक कोटी त्र्याण्णव लक्ष एक्केचाळीस हजार नऊशे बेचाळीस फक्त) इतका निधी विभागीय आयुक्त, नागपूर कार्यालयास अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (Beams) द्वारे वितरीत करण्यात येत आहे.

२. उपरोक्त निधी सन २०१८-१९ मध्ये मागणी क्रमांक, सी-६, २२४५ नैसर्गिक आपत्तीच्या निवारणार्थ सहाय्य ०२, पूर चक्रीवादळे (९३)(०५) पूरामुळे बाधित झालेल्या व्यक्तींच्या पुनर्वसनाकरीता रस्ते, पाणी पुरवठा, शाळा,चावडी, विद्युत पुरवठा, इत्यादी नागरी सुविधा यावरील खर्च (अनिवार्य ) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२४५ ०९८८) या लेखाशीर्षाखाली नमूद केल्याप्रमाणे संबंधितांना वितरीत करुन उपरोक्त नमूद लेखाशीर्षाखाली अंतीमत: खर्ची टाकावा.

३. विभागीय आयुक्त, नागपूर यांनी वित्तीय शिस्तीच्या अनुषंगाने उपरोक्त संदर्भ क्र. ०५ दिनांक १९/०१/२०१९ रोजीच्या शासन निर्णयामधील अटी, शर्तीची पूतर्ता व त्यात नमूद सूचनांप्रमाणे कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२१३१५५०२७५७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

RAJASHREE MILIND RAUT

Digitally signed by RAJASHREE MILIND RAUT
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=58e3cf7b9657c2ed6d6d47f01918bccb8dcaac1f1b6f31c7c723db4deb16f5f2, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=6689500497ea8c2084eb7b303b8b2f3922ec7b73b6347d04e043dc0b8ef0fd64, ou=REVENUE AND FOREST, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=RAJASHREE MILIND RAUT
Date: 2019.02.13 15:53:13 +05'30'

**( राजश्री राऊत )**
**वित्तीय सल्लागार व सह सचिव**

**प्रति,**

१. मा.मंत्री (म. व पु.) यांचे खाजगी सचिव,
२. मा.राज्यमंत्री (म. व पु.) यांचे खाजगी सचिव,
३. अपर मुख्य सचिव (म. व पु.) यांचे स्वीय सहाय्यक,
४. विभागीय आयुक्त, नागपूर.
५. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षण), महाराष्ट्र राज्य, नागपूर
६. जिल्हाधिकारी,नागपूर.
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद नागपूर.
८. जिल्हा पुनर्वसन अधिकारी, नागपूर
९. जिल्हा कोषागार अधिकारी,नागपूर
१०.वित्तीय सल्लागार व सह सचिव , महसूल व वन (म.व पु.) विभाग, मंत्रालय, मुंबई
११.उपसचिव (र-१२), महसूल व वन (म.व पु.) विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.वित्त विभाग(अर्थसंकल्प-६/व्यय-९/ अर्थोपाय कक्ष, वित्त आयोग कक्ष), मंत्रालय,मुंबई-३२,
१३.कार्यासन अधिकारी (ब-१/र-१२/पीएसी कार्यासने), मंत्रालय, मुंबई-३२,
१४.निवडनस्ती ( कार्यासन म-११).